सर्वोदया एज्युकेशन अँड व्हॉलेंटरी असोसिएशन (सेवा), नांदेड संचलित निवासी मुकबधीर विद्यालय, हदगांव ता.हदगांव ,जि.नांदेड या विद्यालयाच्या नैसर्गिक वाढीस अनुदान तत्वावर मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,

शासन निर्णय क्रमांक :- इडीडी-२०१०/प्र.क्र.११०/अ.क.१,

मंत्रालय विस्तार भवन,मुंबई ४०० ०३२.

दिनांक :- ०४.०९. २०१४.

वाचा :-

१) शासन निर्णय, सामाजिक न्याय,सांस्कृतिक कार्य,क्रीडा व विशेष सहाय्य विभाग, क्र.इडीडी-२००१/प्र.क्र.५०२/सुधार-२,दिनांक १९ जुलै २००३.

२) शासन निर्णय, सामाजिक न्याय,सांस्कृतिक कार्य,क्रीडा व विशेष सहाय्य विभाग, क्र.इडीडी-२००३/प्र.क्र.३४०/भाग-२/सुधार-२,दि.१८.०८.२००४ व दि.३०.०१.२००६

३) समाजकल्याण अधिकारी गट-अ,जि.प.नांदेड यांचे पत्र क्र.जिपना/सकवि/अवि/ नै.वा. मान्यता/२०१०-११/१७०६, दि.१८.०४.२०१०

४) आयुक्त,अपंग कल्याण यांचे पत्र क्र.अकआ/प्र-३/अस्थी सर्वोदया/हिंगोली /अनु.विद्या. वाढ/२०११-१२/१४२६,दि.०६.०४.२०११.

**प्रस्तावना :-** सर्वोदया एज्युकेशन अँड व्हॉलेंटरी असोसिएशन (सेवा) नांदेड संचलित निवासी मुकबधीर विद्यालय, हदगांव, ता.हदगावं,जि.नांदेड या शाळेस नैसर्गिक वर्ग वाढ तत्वानुसार २० विद्यार्थी संख्या वाढीस अनुदान तत्वावर मान्यता देण्याचा प्रस्ताव सादर करण्यात आलेला आहे. सदर शाळेस अपंग शाळा संहिता १९९७ मधील तरतुदीनुसार सन २०१४-१५ या शैक्षणिक वर्षापासून २० वाढीव विद्यार्थी संख्येस अनुदान तत्वावर मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-** अपंग शाळा संहिता १९९७ प्रकरण-दोन,भाग-२,परिच्छेद क्र.११ नुसार नैसर्गिक तत्वानुसार वाढीव विद्यार्थी संख्येस अनुदान तत्वावर मान्यता देण्याबाबत तरतुदी नमुद करण्यात आल्या आहेत. सर्वोदया एज्युकेशन अँड व्हॉलेंटरी असोसिएशन (सेवा) नांदेड संचलित निवासी मुकबधीर विद्यालय हदगांव ता.हदगावं,जि.नांदेड या शाळेच्या संस्थेने केलेली विनंती व त्यानुषंगाने आयुक्त,अपंगकल्याण,पुणे यांनी प्रस्तावित केल्यानुसार सदर संस्थेच्या निवासी मुकबधीर

विद्यालय,हदगांव ता.हदगांव,जि.नांदेड या विशेष शाळेस नैसर्गिक वर्गवाढीनुसार वाढीव २० विद्यार्थी संख्येस (निवासी) अनुदान तत्वावर मंजूर करण्यास शासन मान्यता देत आहे. त्यानुसार नैसर्गिक वर्गवाढीनुसार इयत्ता ५ वी ते ७ वी च्या वर्गवाढी २०१४-१५ या शैक्षणिक वर्षापासून वाढीव २० विद्यार्थी संख्येस खालील अटींच्या अधिन राहून अनुदान तत्वावर आणण्यास मान्यता देण्यात येत आहे.

१) सदर विशेष शाळेच्या इयत्ता ५ वी ते ७ वी च्या विद्यार्थी संख्या वाढीस सन २०१४-१५ शैक्षणिक वर्षापासून पुढील वर्गास नियमानुसार आणि आर्थिक क्षमतेनुसार अनुदान अनुज्ञेय राहील.

२) सदरहू शाळेची विद्यार्थी संख्या एकूण २० एवढी विद्यार्थी संख्या इयत्ता ५ वी ते ७ वी करीता अनुज्ञेय राहील. त्यामध्ये शासनाच्या मान्यतेशिवाय बदल करता येणार नाही.

३) अनुदान मान्यतेबाबतच्या विहित अटी व शर्ती आणि कार्यपध्दतीची पूर्तता झालेली असल्याबाबतची खातरजमा आयुक्त,अपंग कल्याण,पुणे यांनी करुन घ्यावी.

४) सदरहू शाळेस शासन वेळोवेळी निश्चित करेल असे नियम,अटी व शर्ती लागू राहतील.

५) आयुक्त,अपंगकल्याण,पुणे यांनी सदर शाळेची मान्य संख्या विचारात घेऊन निश्चित करण्यात आलेल्या आकृतीबंधानुसार देय असणारी पदे मंजूरीसाठीच्या प्रस्तावाचे अनुषंगाने वित्त विभागांतर्गत उच्चस्तर सचिव समितीच्या मान्यतेची कार्यवाही सुरु असून सदर मान्यतेनंतर प्रस्तावित वाढीव २० विद्यार्थी संख्येनुसार मंजूर देय पदावरील वेतन यासाठीचा पुरवणी मागणीचा प्रस्ताव यथावकाश शासनास सादर करावा.

६) सदरहू शाळेस केंद्र शासन,स्थानिक संस्थांकडून किंवा इतर संस्थांकडून अनुदान मिळत आहे असे निदर्शनास आल्यास संस्थेस राज्य शासनाचे अनुदान मिळणार नाही.

७) प्रस्तुत मंजूरीचे आदेश हे मा.उच्च न्यायालय,खंडपीठ,औरंगाबाद येथे दाखल करण्यात आलेल्या याचिका क्र.१३५/२००० निकालाच्या अधीन राहतील.

८) शासनाने अपंग शाळांना नैसर्गीक वाढीनुसार वाढीव विद्यार्थी संख्येस अनुदान तत्वावर आणण्याकरीता वेळोवेळी विहित केलेल्या अटी व शर्ती आणि कार्यपध्दतीने पालन झालेले नाही असे आढळून आल्यास, सदरहू संस्थेची मान्यता रद्द करण्यात येईल.

२. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्या विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक ६८७/व्यय १४, दिनांक २६.०८.२०१४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

३ सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९०४१६५१२१४६२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Pratap Pandurang Lubal

Digitally signed by Pratap Pandurang Lubal
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justice &Spl Assistance, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Pratap Pandurang Lubal
Date: 2014.09.04 16:46:57 +05'30'

**(प्र.पां.लुबाळ)**

**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

प्रति,

१) आयुक्त,अपंग कल्याण,महाराष्ट्र राज्य,पुणे,
२) प्रादेशिक उपायुक्त,समाजकल्याण विभाग,लातूर,
३) महालेखापाल,महाराष्ट्र-१/२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर,
४) मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद, नांदेड,
५) जिल्हा समाजकल्याण अधिकारी, जिल्हा परिषद, नांदेड,
६) जिल्हा कोषागार अधिकारी,नांदेड,
७) संस्थापक, सर्वोदया एज्युकेशन अँड व्हॉलेंटरी असोसिएशन (सेवा) नांदेड संचलित निवासी मुकबधीर विद्यालय, हदगांव, ता.हदगावं,जि.नांदेड
८) निवड नस्ती,अ.क.१